माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडील दुर्मिळ फोटोंच्या व्यस्त प्रतिमांचे (निगेटिव्ह ) डिजिटलायझेशन करण्यास मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक माजम- २०१०/प्र.क्र.२६३/का.३४.

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दि. ३ सप्टेंबर, २०१०

**शासन निर्णयः-**

संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीपासूनच्या अनेक घटना /प्रसंगाची दुर्मिळ छायाचित्रे ३५ एमएम आणि १२० एमएमच्या व्यस्त प्रतिमांच्या (निगेटिव्ह) स्वरुपात आहेत. सदर व्यस्त प्रतिमा (निगेटिव्ह) डिजिटलायझेशन करुन जतन करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. या प्रस्तावावर विचार करुन संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीपासूनच्या अनेक घटना /प्रसंगाची ३५ एमएम आणि १२० एमएमच्या व्यस्त प्रितिमांच्या (निगेटिव्ह) स्वरुपात असलेल्या दुर्मिळ छायाचित्रांचे डिजिटलायझेशन करण्यास शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर काम मे. अपना स्टुडिओ लि. मुंबई यांचेकडून करुन घेण्यास विभागीय भांडार समितीने व महासंचालकांनी मान्यता दिली आहे.

२. चालू वित्तीय वर्षात ३५ एमएमच्या ८०,००० आणि १२० एमएमच्या १७,४५० अशा एकूण ९७,४५० व्यस्त प्रतिमांचे डिजिटलायझेशन करुन घेण्यास व त्याकरीता येणाऱ्या रु.२५,००,०००/- (रुपये पंचवीस लाख फक्त) इतक्या खर्चास शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून व्यस्त प्रतिमांचे डिजिटलायझेशन करुन घेण्याची कार्यवाही माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत विहित कार्यपध्दती अवलंबून करण्यात यावी.

३. याबाबतचा खर्च मागणी क्र.ए-६, २२२०-माहिती व प्रसिध्दी, ०१-चित्रपट-छायाचित्र सेवा-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००)(००) छायाचित्र सेवा (२२२० ०४१९) या लेखाशीर्षाखालील मंजुर अनुदान बी.डी.एस. वर उपलब्ध झाल्यानंतर नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेनंतर भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra. gov.com या वेबसाईडवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१००९०३१४०९१७००१ असा आहे.

महाराष्ट्राच्या राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(आ. म. लुडबे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रती,**

महासंचालक, माहिती व जनसंपर्क ,मंत्रालय,मुंबई-३२

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई-३२

महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा व अनुज्ञेयता/(लेखा परीक्षा) / मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

निवासी लेखा परीक्षाअधिकारी, मुंबई

उप संचालक (लेखा) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२

लेखा अधिकारी,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२

**निवड नस्ती /३४**